नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४३)/का-१४११,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १४ मार्च, २०२४

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२,
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुन:स्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिकानगरपंचायत/नगरपरिषद/)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार दापोली नगरपंचायत/मंडणगड नगरपंचायत/ रोहा नगरपरिषद/ श्रीवर्धन नगरपरिषद/ म्हसळा नगरपंचायत/ मुरुड नगरपरिषद अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रु.१५.०० कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा दापोली नगरपंचायत/मंडणगड नगरपंचायत/ रोहा नगरपरिषद/ श्रीवर्धन नगरपरिषद/ म्हसळा नगरपंचायत/ मुरुड नगरपरिषद राहतील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, रत्नागिरी/रायगड यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, रत्नागिरी/रायगड यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, रत्नागिरी/रायगड यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC

कोड व खाते क्रमांक) नियोजन विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, रत्नागिरी/रायगड व दापोली नगरपंचायत/मंडणगड नगरपंचायत/ रोहा नगरपरिषद/ श्रीवर्धन नगरपरिषद/ म्हसळा नगरपंचायत/ मुरुड नगरपरिषद यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.ओ-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन,(०१)(०२), नागरी स्थानिक संस्थांना (नगरपालिका) सहायक अनुदान (नगरपंचायत/नगरपरिषद/३६०४ १०१८(कार्यक्रम) (, ३१,सहायक अनुदानया लेखाशीर्षाखाली " सन २०२३-करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात २४ .येईल

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४२०३२४०८४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.14 20:41:40 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी/रायगड,
३. मुख्य अधिकारी, दापोली नगरपंचायत/मंडणगड नगरपंचायत/ रोहा नगरपरिषद/ श्रीवर्धन नगरपरिषद/ म्हसळा नगरपंचायत/ मुरुड नगरपरिषद, जि रत्नागिरी/रायगड,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, रत्नागिरी/रायगड,
५. मा.उप मुख्यमंत्री(वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी/रायगड,
९. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

| | शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(४३)/का-१४११, दि.१४ मार्च, २०२४ सोबतचे परिशिष्ट | |
|---|---|---|
| अ.क्र. | कामाचे नावे | रक्कम रु. लक्ष |
| १ | दापोली नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. १७ वडाचा कोंड मधील कृष्ण मंदिर ते सुनील पोळेकर घर बंदीस्त पाईप गटार बांधणे, ता दापोली, जि. रत्नागिरी | २०.०० |
| २ | दापोली नगरपंचायत हद्दीतील तलाठी कार्यालय ते गद्रे पुलपर्यंत बंदीस्त पाईप गटार बांधणे, ता. दापोली, जि. रत्नागिरी | १०.०० |
| ३ | दापोली नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. ६ मधील नटराज नाका ते मारुती मंदिर पुल (मेहता मेडिकल ) पर्यंत बंदीस्त पाईप गटार व रस्ता डांबरीकरण करणे, ता. दापोली, जि. रत्नागिरी | १८.०० |
| ४ | दापोली नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. ६ मंगला कोल्डड्रिक्स तेटिळक चौकापर्यंत गटार करणे, ता. दापोली, जि. रत्नागिरी | ९.०० |
| ५ | दापोली नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. १७ नॅशनल हायस्कुल-रुपनगर-सिध्दवेद निवासी संकुल रस्तामजबुतीकरण व डांबरीकरण करणे, आवश्यक तेथे गटार बांधणे, ता. दापोली, जि. रत्नागिरी | २३.०० |
| ६ | दापोली नगरपंचायत हद्दीतील हिंद एज्युकेशन सोसायटी अंतर्गत सभामंडप, शैक्षणिक सोयीसुविधा व इमारत बांधकाम करणे, ता. दापोली, जि. रत्नागिरी | २०.०० |
| ७ | मंडणगड नगरपंचायत डंपिंग ग्राऊंड कडे जाणारा रस्ता मजबुतीकरण व डांबरीकरण करणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | ३०.०० |
| ८ | कोझर येथे विहिरीला संरक्षणभिंत बांधणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | २५.०० |
| ९ | मंडणगड नगरपंचायत हद्दीतील मुख्य पाट रस्ता ते मंडणगड जॅकवेलकडे जाणारा रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | १५.०० |
| १० | मंडणगड नगरपंचायत हद्दीतील यशवंत मर्चंडे ते सुनील मर्चंडे यांच्या घरासमोर मुख्य रस्त्यास संरक्षणभिंत बांधणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | १५.०० |
| ११ | मंडणगड नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. १२ श्री. बळीराम वाडकर यांच्या घरापासून रस्त्या लगत संरक्षणभिंत बांधणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | १०.०० |
| १२ | मंडणगड नगरपंचायत हद्दीतील वार्ड क्र. १७ मध्ये तुरेवाडी येथे रस्त्यालगत संरक्षणभिंत बांधणे, ता. मंडणगड, जि. रत्नागिरी | १०.०० |
| १३ | रोहा नगरपरिषद हद्दीतील डॉ. सी.डी. देशमुख नवीन शहर सभागृह (नाट्यगृह) बांधणे, ता. रोहा, जि. रायगड | ७००.०० |
| १४ | श्रीवर्धन नगरपरिषद अंतर्गत शिवाजी रोडपासून कुंभारवाडा ते आयर मोहल्ला पर्यंत पऱ्ह्याचे बांधकाम करणे, ता. श्रीवर्धन, जि. रायगड | २००.०० |
| १५ | श्रीवर्धन नगरपरिषद अंतर्गत श्रीवर्धन समुद्र किनारी वाढीव धुप प्रतिबंधक बंधारा बांधणे व सुशोभिकरण करणे, ता. श्रीवर्धन, जि.रायगड | १७५.०० |
| १६ | सावर येथे म्हसळा नगरपंचायतची नवीन प्रशासकिय इमारत बांधणे, ता. म्हसळा, जि. रायगड | १५०.०० |
| १७ | मुरुड नगरपरिषद अंतर्गत अंजूमन-ए-इस्लाम उर्दु प्राथमिक शाळा येथे शैक्षणिक सोयीसुविधा व इमारत बांधकाम करणे, ता. मुरुड, जि.रायगड | २०.०० |
| १८ | मुरुड नगरपरिषद अंतर्गत इदगाह रोड तयार करणे, ता. मुरुड, जि.रायगड | ५०.०० |
| | **एकूण** | **१५००.००** |